“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालयास निधी वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.४८१/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १ ऑगस्ट, २०२३

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन पत्र क्र. संकिर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सां.का.४, १७ फेब्रुवारी, २०२३
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. गेवेइं-२०२३/प्र.क्र.१५६/सां.का.३, २४ मे, २०२३

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ५ डिसेंबर, २०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपर्निर्दिष्ट क्र.१ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवा निमित्त “शिवराज्याभिषेक सोहळा” करीता सांस्कृतिक कार्य विभागास रुपये ५०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील शासन निर्णयान्वये पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालयाच्या मराठकालीन पुरातन शस्त्र प्रदर्शनाचे आयोजनास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालयास निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एक छत्र योजनेंतर्गत ३५० व्या राज्याभिषेक सोहळा निमित्त “शिवराज्याभिषेक सोहळा” करीता पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालयामार्फत आयोजित करण्यात आलेल्या गेट वे ऑफ इंडिया, मुंबई येथे दि.१ ते ६ जून, २०२३ या कालावधीत मराठाकालीन पुरातन शस्त्रांचे प्रदर्शनाकरीता एकुण रुपये १,१५,२०,२३७/- ( अक्षरी रुपये एक कोटी पंधरा लाख वीस हजार दोनशे सदोतीस फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडड-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती , (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत कार्यक्रम (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. सदर खर्च करण्यासाठी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनलाय, मुंबई नियंत्रण अधिकारी घोषित करण्यात येत असून, त्यांनी घोषित केलेले अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०८०११६१३५७९५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS RAMRAO THORAT

Digitally signed by VILAS RAMRAO THORAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CB03C92B399CC89310BF1378C184D97A4B7B9B98E926EA8E71DD7BC9CB273631, cn=VILAS RAMRAO THORAT
Date: 2023.08.07 14:29:22 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव ( सां.का.३,४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
६. संचालक, पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
उपरोक्त शासन निर्णयातील नियंत्रण अधिकारी यांना निधी वितरणाची कार्यवाही करण्यात यावी करावी.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१४. निवड नस्ती, सां.का.४.